**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः क्र.कअप १२२२/प्र.क्र.६५/१४ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २५ ऑगस्ट, २०२३

## आदेश

मंत्रालयीन विभागातील खालील सहायक कक्ष अधिकारी [गट-ब (अराजपत्रित) वेतनश्रेणी S-१४ : रु. ३८६००-१२२८००] यांना कक्ष अधिकारी [गट-ब (राजपत्रित) वेतनश्रेणी S-१७ : रु. ४७६००-१५११००) पदावर या आदेशाद्वारे विहित अटीच्या अधीनतेने निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे तसेच सदर सहायक कक्ष अधिकारी यांची पदोन्नती नंतरची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ-७ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | श्री/ श्रीमती | सहायक कक्ष अधिकाऱ्यांचे नांव | आयोगाने स.क.अ. पदावर शिफारस केलेला प्रवर्ग | व्यक्तीचा प्रवर्ग | सध्याचा विभाग | पदोन्नतीनंतरचा विभाग |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १) | श्रीमती | वै.प्र.राजभोई (भोकरे) | भज(ब) | भज (ब) | महिला व बाल विकास विभाग | **उच्च व तंत्रशिक्षण विभाग** |
| २) | श्री | दि.रा.गायकवाड **(क्षीणदृष्टी)** | खुला-क्षीणदृष्टी | खुला | ग्राम विकास विभाग (प्रतिनियुक्ती- भाडे नियंत्रण कायदा, पुणे) | **प्रपत्र बढती (भाडे नियंत्रण कायदा, पुणे कार्यालयात अधीक्षक वर्ग-२ या पदावर)** |
| ३) | श्रीमती | म.वि.गोंधळी | इमाव | इमाव | गृह विभाग | **सामान्य प्रशासन विभाग** |
| ४) | श्रीमती | स.द.घोडके | भज(क) | भज (क) | सामान्य प्रशासन विभाग | **सामान्य प्रशासन विभाग** |
| ५) | श्री | प्र.बा.राठोड | विजा(अ) | विजा (अ) | गृह विभाग | **गृह विभाग** |
| ६) | श्रीमती | पु.पां.रावण | इमाव | इमाव | गृह विभाग | **गृह विभाग** |
| ७) | श्री | श्री.द.जिरेवार | अज | अज | वैद्यकिय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग | **उद्योग, उर्जा व कामगार विभाग** |
| ८) | श्रीमती | दि.र.कांबळे ( दि.सु.पवार) | अजा | अजा | ग्राम विकास विभाग | **ग्राम विकास विभाग** |
| ९) | श्रीमती | सु.वि.धांडे (सु.के.धांडे) | अजा | अजा | कृषि व पदुम विभाग | **कृषि व पदुम विभाग** |

| अ. क्र. | श्री/ श्रीमती | सहायक कक्ष अधिकाऱ्यांचे नांव | आयोगाने स.क.अ. पदावर शिफारस केलेला प्रवर्ग | व्यक्तीचा प्रवर्ग | सध्याचा विभाग | पदोन्नतीनंतरचा विभाग |
|---|---|---|---|---|---|---|
| १०) | श्री | न.आ.कदम **(कर्णबधीर)** | खुला- कर्णबधीर | खुला | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग | **पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग** |
| ११) | श्रीमती | रु.भ.लाटे | इमाव | इमाव | जलसंपदा (प्रतिनियुक्ती- विभागीय पोलीस तक्रार प्राधिकरण, नाशिक) | **प्रपत्र बढती (विभागीय पोलीस तक्रार प्राधिकरण, नाशिक कार्यालयात प्रशासकीय अधिकारी या पदावर)** |
| १२) | श्री | अ.आ.यादव **(अस्थिव्यंग)** | खुला- अस्थिव्यंग | खुला | सामान्य प्रशासन विभाग (प्रतिनियुक्ती- राज्य माहिती आयोग, पुणे) | **वित्त विभाग** |
| १३) | श्रीमती | स.रा.डेहनकर | इमाव | इमाव | विधि व न्याय विभाग | **सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग** |
| १४) | श्रीमती | वि.हं.पाटील | इमाव | इमाव | गृह विभाग | **गृह विभाग** |
| १५) | श्रीमती | चे.गो.दुसाणे | इमाव | इमाव | अल्पसंख्याक विकास विभाग | **अल्पसंख्याक विकास विभाग** |
| १६) | श्री | हे.त्र्यं.महाले | अज | अज | जलसंपदा विभाग | **जलसंपदा विभाग** |
| १७) | श्री | दि.वि.पाटील **(क्षीणदृष्टी)** | खुला- क्षीणदृष्टी | खुला | अन्न व नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | **अन्न व नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग** |
| १८) | श्री | सं.सु.गायकवाड | इमाव | इमाव | सामाजिक न्याय व विशाष सहाय्य विभाग | **नगर विकास विभाग** |
| १९) | श्री | सु.कि.सुर्यवंशी | - | खुला | महसूल व वन विभाग | **पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग** |
| २०) | श्रीमती | रु.श.सोनवणे | अज | अज | गृह विभाग (प्रतिनियुक्ती- राज्य माहिती आयोग, पुणे) | **वित्त विभाग** |
| २१) | श्री | र.कृ.मेरगु | खुला | खुला | सार्वजनिक बांधकाम विभाग | **सार्वजनिक बांधकाम विभाग** |

२. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम ४०, परिशिष्ट -२, अट क्र. १८ नुसार प्रतिनियुक्तीवर कार्यरत असलेल्या **श्री. दि.रा.गायकवाड** (अ.क्र.२) व **श्रीमती रु.भ.लाटे** (अ.क्र.११), सहायक कक्ष अधिकारी यांना तात्पुरत्या स्वरुपात ते कार्यरत असलेल्या प्रतिनियुक्तीच्या कार्यालयात प्रपत्र बढती

(पदोन्नती) देण्यात येत आहे. उपरोक्त तरतुदीनूसार **प्रपत्र बढतीचा कालावधी या आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्यानी समाप्त होईल. त्यानंतर त्यांनी मंत्रालयीन विभागात कक्ष अधिकारी पदावर रुजू व्हावे.**

३. पुढील अटीच्या अधीन राहून संबंधित सहायक कक्ष अधिकारी यांना कक्ष अधिकारी संवर्गात सरळसेवा कोटयात रिक्त असलेल्या पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे :-

१) **सदरची पदोन्नती ही प्रशासकीय निकड म्हणून तात्पुरत्या स्वरुपातील तदर्थ पदोन्नती राहील**.

२) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तदर्थ पदोन्नतीच्या परिणामी पदोन्नत अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

३) सरळसेवा कोटयात रिक्त असलेल्या पदावर देण्यात आलेली तदर्थ पदोन्नती ही ११ महिने किंवा म.लो.आ. कडून उमेदवार उपलब्ध होतील, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत राहील. दरम्यानच्या काळात आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध झाल्यास अथवा प्रतिनियुक्तीवर बाहेर गेलेले अधिकारी प्रत्यावर्तनाने मंत्रालयात रुजू झाल्यास तदर्थ पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यास पदावनत करण्यात येईल. सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात असून सदर पदावर संबंधित अधिकाऱ्याचा कायमस्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

४) सरळसेवा व पदोन्नत कक्ष अधिकाऱ्यांनी परस्पर सेवा ज्येष्ठतेबाबतत मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट पिटीशन क्र.२९८२/२०००, क्र.२९८६/२०००, ४९५८/२००३ व क्र.३३७४/२०११ मा.न्यायालयाने दि.०६.०८.२०१८ रोजी निकाली काढल्या असून, मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयानुसार दि.०१.०१.१९८६ पासूनच्या कक्ष अधिकारी संवर्गाच्या ज्येष्ठतासूच्या पुनर्विलोकीत करण्यात येत आहेत. सदर पदोन्नत्या या सुधारीत ज्येष्ठतासुचीच्या अधीन राहून देण्यात येत आहेत. मा.न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार निवडसूच्या / ज्येष्ठतासूच्या सुधारित झाल्यानंतर पदोन्नत होणाऱ्या अधिकाऱ्यांचे ज्येष्ठतासूचीतील स्थान खाली जाणे अथवा पदानवत होणे या बाबी उद्भवू शकतात. मा.उच्च न्यायालयाच्या दि.०६.०८.२०१८ रोजीच्या आदेशाविरूध्द पदोन्नत अधिकाऱ्यांनी मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २५१८१/२०१८ दाखल केली आहे. सदर तदर्थ पदोन्नत्या या मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल झालेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २५१८१/२०१८ च्या अधीन राहतील.

५) मा.उच्च न्यायालयाने दिनांक ०४.०८.२०१७ रोजी पदोन्नतीतील आरक्षणाबाबत शासनाने निर्गमित केलेला दिनांक २५.०५.२००४ चा शासन निर्णय रद्दबातल ठरविला आहे. सदर निर्णयाविरुध्द शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर तदर्थ पदोन्नत्या या राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ च्या च्या अधीन राहतील.

६) सदर तदर्थ पदोन्नत्या मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्रमांक ८६२/२०१६ (श्री.तेलवेकर विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर) च्या अधीन राहतील.

७) सदर तदर्थ पदोन्नत्या मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल मूळ अर्ज क्र.११९२/२०२२ (श्री.विशाल टेके व इतर विरुध्द महाराष्ट्र शासन) च्या अधीन राहतील.

८) सहायक कक्ष अधिकारी पदावरुन कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीची सन २०२२-२३ ची पूरक निवडसूची तदर्थ स्वरुपाची असून सदर पदोन्नत्या ह्या तात्पुरत्या स्वरुपाच्या आहेत. परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमित पदाचा व सेवा ज्येष्ठतेचा कोणतेही हक्क मिळणार नाही.

९) दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत साप्रवि/१६-ब यांनी दिनांक २०.०४.२०२३ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या आदेशाच्या अधीन सदर तदर्थ पदोन्नत्या देण्यात येत आहेत.

१०) सदर पदोन्नत्या तात्पुरत्या स्वरुपाच्या असून त्या केवळ पदोन्नत कोटयात उपलब्ध होणाऱ्या पदांनुसार नियमित करण्यात येतील.

११) संबंधित सहायक कक्ष अधिकारी यांनी कक्ष अधिकारी पदावरील तदर्थ पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दिनांक १२.०९.२०१६ व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.एसआरव्ही २०१८/प्र.क्र.१५९/कार्यासन-१२, दिनांक ०१.०८.२०१९ मधील तरतूदीनुसार संबंधित अधिकाऱ्याचे नांव सन २०२२-२३ च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल आणि, पुढील दोन वर्षी (सन २०२३-२४ व २०२४-२५) होणाऱ्या निवडसूच्यांमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत (सन २०२५-२६) कक्ष अधिकारी पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

१२) सदर अधिकाऱ्यांची कक्ष अधिकारी पदावरील तदर्थ पदोन्नती ही सदर अधिकाऱ्यांविरुध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे. त्यानुसार संबंधित विभागाने खातरजमा करुन संबंधित अधिकाऱ्याविरुध्द विभागीय चौकशीची कार्यवाही सुरु वा प्रस्तावित असल्यास या विभागास अवगत करावे.

१३) पदोन्नत अधिकाऱ्यांनी या आदेशाच्या दिनांकापासून **तीस दिवसांमध्ये** कक्ष अधिकारी पदावर रुजू होणे आवश्यक आहे. संबंधित विभागाने पदोन्नत झालेल्या कक्ष अधिकारी यांना विहित कालावधीत कार्यमुक्त करावे.

१४) संबंधित विभागांनी कार्यमुक्ततेच्या तसेच रुजू करुन घेतल्याच्या आदेशाच्या प्रती कार्यासन १४-ब ला पाठवाव्यात.

४. महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरणातील तरतूदीनुसार पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण घेणे संबंधित पदोन्नत अधिकाऱ्यांवर बंधनकारक राहील अन्यथा संबंधित कक्ष अधिकाऱ्यास सहायक कक्ष अधिकारी पदावर पदावनत करण्यात येईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८२५१८१२२८३१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIVEK RAMAKANT JADHAV

Digitally signed by VIVEK RAMAKANT JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=0c6f092192cae76ac289eef2587c5f28373c6e445e4552e27b340b424d48717c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F960CA130E1B6E0A979CBB41C7516CA46961184AD1E4ECE1A118390C02E6745E, cn=VIVEK RAMAKANT JADHAV
Date: 2023.08.25 18:13:55 +05'30'

**( वि. र. जाधव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
**संबंधित सहायक कक्ष अधिकारी (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)**
**प्रत,**

१) अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग. (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)
२) सह सचिव/उप सचिव (आस्थापना), सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग.
३) आयुक्त, राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ, पुणे
४) सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा कार्यालय, पुणे विभाग, पुणे
५) पोलीस उप आयुक्त (मुख्या) तथा कार्यालय प्रमुख, विभागीय पोलीस तक्रार प्राधिकरण, नाशिक
६) कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन.क्र.१४,१४-अ
७) निवडनस्ती, कार्यासन क्र.१४-ब /संग्रहार्थ